**राष्ट्रीय नदी संवर्धन योजना (नागपूर येथील नाग नदी प्रदूषण प्रतिबंध प्रकल्प) या केंद्र पुरस्कृत योजनेच्या निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन करिता Single Nodal Agency (SNA) व Nodal Officer यांची नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : रानयो/२०२४-प्रअ-आस्थापना/८२.क्र.**
नविन प्रशासन भवन, १५वा मजला,
हुतात्मा राजगूरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ०३/०३/२०२५.

**संदर्भ:** १) भारत सरकार यांच्या वित्त मंत्रालयाचे कार्यालयीन ज्ञापण F.No.१ (१३) PFMS /FCD/२०२०, दि.२३ मार्च २०२१.
२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२१/ प्र.क्र. ३५/ कोषा-प्रशा-४, दि.१ जुलै, २०२१
३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२१/ प्र.क्र. ८४/ कोषा-प्रशा-४, दि.१५ सप्टेंबर, २०२१

**प्रस्तावना:**

केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करणे तसेच निधी विनियोगाच्या प्रक्रीयेत अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने संदर्भाधीन दि.२३ मार्च, २०२१ रोजीच्या ज्ञापनान्वये सुधारित कार्यपद्धतीचा अवलंब करण्याचे निर्देश दिले आहेत. त्यास अनुसरून वित्त विभागाने दि.१ जुलै, २०२१ व दि. १५ सप्टेंबर, २०२१ रोजीच्या शासन परिपत्रकांन्वये केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियम व्यवस्थापन (PFMS) बाबत सुधारित सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार केंद्र पुरस्कृत योजनांच्या अंमलबजावणीसाठी एका Single Nodal Agency (SNA) ची नेमणूक करून त्या योजनेच्या अंमलबजावणीसाठी श्येड्युल कमर्शिअल बँकेत स्वतंत्र बचत बँक खाते उघडणे आवश्यक आहे. तसेच सदर केंद्र पुरस्कृत योजनांच्या समन्वयाच्या दृष्टीने किमान उप सचिव दर्जाच्या अधिका-याची Nodal Officer म्हणून नियुक्ती करण्याबाबत निर्देशित केले आहे. त्यानुसार पर्यावरण व वातावरणीय बदल विभागामार्फत राबविल्या जाणा-या **राष्ट्रीय नदी संवर्धन योजना (नागपूर येथील नाग नदी प्रदूषण प्रतिबंध प्रकल्प)** या केंद्र पुरस्कृत योजनेच्या निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन करिता Single Nodal Agency (SNA) व Nodal Officer यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांनुसार **राष्ट्रीय नदी संवर्धन योजना (नागपूर येथील नाग नदी प्रदूषण प्रतिबंध प्रकल्प)** या केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीसाठी सह सचिव, आस्थापना-अ, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांची Single Nodal Agency (SNA) व Nodal Officer म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

२. सदर योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त होणा-या निधीसाठी तसेच अनुरूप राज्य हिस्सा जमा करण्यासाठी Single Nodal Agency (SNA) चे स्वतंत्र बँक खाते (Single Nodal Bank Account) व अंमलबजावणी यंत्रणा (**नागपूर महानगरपालिका**) यांना शुन्य शिल्लक उपखाते (Zero Balance Subsidiary Account) बँक ऑफ महाराष्ट्र या बँकेत उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर केंद्र पुरस्कृत योजनेचा निधी वितरण व विनियोग व्यवस्थापनबाबत वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ व क्र.३ येथील परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनानुसार आवश्यक ती कार्यवाही तातडीने करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३०३१७१८३३२१०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MADANE VISHAL VISHWAS

Digitally signed by MADANE VISHAL VISHWAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CB16DB1CC002E115B709A8CA348A6483883493AAF53B7BE25836CDA1B57FF2DC, cn=MADANE VISHAL VISHWAS
Date: 2025.03.03 17:20:25 +05'30'

**(वि. वि. मदने)**
**अवर सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (पर्यावरण व वातावरणीय बदल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल), मंत्रालय, मुंबई.
४. अ.मु.स, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अ.मु.स, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर.

७. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०००२०.

८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०००२०

९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.

१०.महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर

११. अधिदान व लेखाधिकारी, वान्द्रे (पूर्व) मुंबई-४०००५१.

१२.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

१३.सचालक, लेखा व कोषागरे, मुबई

१४.वित्त विभाग (व्यय-१६)

१५.नियोजन विभाग (कार्यासन-१४७२)

१६. निवड नस्ती